**प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM-JANMAN) या योजनेकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये केंद्र शासनाच्या पहिल्या हप्त्याचा पहिला भाग निधी रु.१२०,००,००,०००/- व राज्य समरुप हिस्सा रु.८०,००,००,०००/- एवढा निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांक: प्रआयो-२०२४/प्र.क्र.१५०/योजना-१०
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१.
तारीख: २७ मार्च, २०२५

वाचा :-

१) ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांक प्रआयो-२०२३/प्र.क्र.२९४/योजना १० दि.०९.०८.२०२४.
२) ग्राम विकास विभाग शासन निर्णय क्रमांक प्रआयो-२०२३/प्र.क्र.२९४ (भाग-१)/योजना-१० दि.१३.०८.२०२४
३) ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार,नवी दिल्ली यांचे क्र. J-१२०२५/१/२०२५-RH-Pol.(३९१४४९)-Maharashtra दि.२५.०३.२०२५ रोजीचे आदेश.
४) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण यांचे पत्र क्र.जा.क्र. राव्यक-ग्रागृ/ लेखा (प्रआयो)/१st installment/PM-JANMAN/२०२५/७७६, दिनांक.२५.०३.२०२५.
५) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.१०८/अर्थ ३ दिनांक.०८.०१.२०२५.
६) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ ३ दिनांक.१७.०३.२०२५.
७) आदिवासी विकास विभागाकडिल शासन परिपत्रक, क्रमांक बीयुडी-२०२४/प्र.क्र.०२/ कार्यासन ६ दिनांक १७.०१.२०२५.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक ३ येथील दि.२५.०३.२०२५ रोजीच्या आदेशान्वये, प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM-JANMAN) या योजनेकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये केंद्र शासनाच्या हिश्श्याचा पहिल्या हप्त्याचा पहिला भाग म्हणून रु.१२०,००,००,०००/- (अक्षरी रुपये एकशे वीस कोटी फक्त) एवढा निधी वितरीत केला आहे. सदर निधीस रु.८०,००,००,०००/- (अक्षरी रुपये ऐंशी कोटी फक्त) एवढा राज्य समरुप हिस्सा अनुज्ञेय आहे. सदर

निधी डिसेंबर, २०२४ रोजीच्या हिवाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्ववारे अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतुदीमधून तसेच वित्त विभागाचा संदर्भ क्रमांक ५ व ६ येथील अनुक्रमे दिनांक ०८.०१.२०२५ व १७.०३.२०२५ तसेच आदिवासी विकास विभागाचा संदर्भ क्रमांक ७ दिनांक १७.०१.२०२५ च्या शासन निर्णयास अनुसरून केंद्र हिस्सा रक्कम रूपये १२०,००,००,०००/- व राज्य हिस्सा रुपये ८०,००,००,०००/- अशी एकूण रक्कम रुपये २००,००,००,०००/- (अक्षरी रुपये दोनशे कोटी फक्त) इतका निधी खर्च करण्यास व अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०२४-२५ या वर्षातील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. केंद्र हिश्श्याचा निधी मागणी क्र टी-५, २५०५, ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाति क्षेत्र उपयोजना (०१)(०७), प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महा अभियान (पीएम जनमन) अंतर्गत आदिम जमातीमधील कुटुंबांसाठी आवास योजना (ग्रामीण) (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम), ३३ अर्थसहाय्य, (२५०५ ए१९२) व राज्य हिश्श्याचा निधी मागणी क्र. टी-५, २५०५, ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाति क्षेत्र उपयोजना (०१) (०८), प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महा अभियान (पीएम-जनमन) अंतर्गत आदिम जमातीमधील कुटुंबांसाठी आवास योजना (ग्रामीण) (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम), ३३ अर्थसहाय्य, (२५०५ ए२०९) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा..

३. प्रस्तुत निधीबाबत उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण-गृहनिर्माण हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून (संकेतांक क्रमांक १२०१००५१८३) तसेच संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण-गृहनिर्माण हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधीचे देयके ठाणे कोषागार अंतर्गत उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर येथे पारित करण्यात यावेत.

४. प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महा अभियान (पीएम-जनमन) ही योजना केंद्र पुरस्कृत असल्याने, या शासन आदेशाद्वारे वितरीत होणारा निधी संबंधित योजनेच्या Single Nodal Agency (SNA) खात्यामध्ये वर्ग करण्यात यावा.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती कार्यासन योजना-२ यांना सादर करण्यात यावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा देयक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयात नोंद झालेल्या रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

६. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची व कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. अन्यथा शासन स्तरावरुन कारवाई केली जाईल.

**७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाकडील शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.१०८/अर्थ ३ दिनांक.०८.०१.२०२५ व शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक १७ मार्च, २०२५ अन्वये, केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत निधी वितरणाबाबतच्या अटी व शर्तीनुसार तसेच विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांतर्गत तसेच आदिवासी विकास विभागाकडील शासन परिपत्रक, क्रमांक बीयुडी-२०२४/प्र.क्र.०२/ कार्यासन ६ दिनांक १७.०१.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.**

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२७१९४२०८१२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SANGEETA MADAN KHOLGADGE

Digitally signed by SANGEETA MADAN KHOLGADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=7736f254e7550bbb9fe5a91ee61214c90d51f1a8c6f9f11ac72483ab7aa9d69d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=83DE86408C50C73CCF3F7BB3C747E6CEB249A1DDF2F026EC32694DF4BBBBD4A9, cn=SANGEETA MADAN KHOLGADGE
Date: 2025.03.27 20:04:25 +05'30'

**(स.म.खोलगाडगे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

1. १) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच जादा प्रतींसह)
2. २) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, ४ था मजला, दक्षिण कक्ष, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
3. ३) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
4. ४) कोषागार अधिकारी (सहायक संचालक संवर्ग), उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर.

५) आदिवासी विकास विभाग (कार्यासन -६, ८ व १७), मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

६) वित्त विभाग (व्यय-१४ व १५) व (अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

७) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७, ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई-४०० ००१.

८) निवड नस्ती योजना-१०.